**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या वर्षात कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान योजनेसाठी निधी वितरण.**
**(लेखाशीर्ष २४०१ ८२९१)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-**२०२३**/ प्र.क्र.०७/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २३ मे,२०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२३ /प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) कृषि विभागाची नस्ती क्र.कृषिवि-३७२३/प्र.क्र.८४/७-अे.

**प्रस्तावना :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२३" यास विधानमंडळाने मंजुरी दिलेली असुन महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. त्यानुसार वित्त विभाग शासन परिपत्रक दि.१२.०४.२०२३ अन्वये अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात प्रथम नऊमाहीकरीता आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ७० टक्केच्या (डिसेंबर,२०२३ अखेर पर्यंत) मर्यादेत दर तिमाही करीता २०:२०:३० टक्के या प्रमाणात अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येणार आहे.

त्यानुषंगाने आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषि विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पिय तरतुदीतील वितरणासाठी उपलब्ध असलेल्या मर्यादेतील १० टक्के निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) व ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली या योजनेसाठी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या निधी वितरण मर्यादेत सन २०२३-२४ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून रु.१००.०० लाख इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पीय तरतूद** | **सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **६** |
| कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान | २४०१ ८२९१ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ५००.०० | ५०.०० |
| | | ३६-सहायक अनुदाने (वेतन) | ५००.०० | ५०.०० |
| | **एकूण** | | **१००.००** | **१००.००** |

२. उपरोक्तप्रमाणे **एकूण रु.१००.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषि विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ मधील परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२२१७००४४२७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.05.24 15:42:54 +05'30'

**( राजेंद्र दे.भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग